महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. यांनी मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या मुळ सिव्हील अपिल क्रमांक ३४४५/२०११ मध्ये I.A.No.६०५८२ of २०२२ मध्ये मागणी केलेली रक्कम अदा करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांक : पुरक ०२२४/प्र.क्र.२५/३-स

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१६/प्र.क्र.१७५/३-स, दि.३०.०३.२०१९.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१६/प्र.क्र.१७५/३-स, दि.२५.०७.२०१९.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१६/प्र.क्र.१७५(भाग-४)/३-स, दि.१२.१२.२०१९.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१६/प्र.क्र.१७५/३-स, दि.०५.०८.२०२१.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका-२०१६/प्र.क्र.१७५/३-स, दि.२२.०२.२०२२.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक यांचे पत्र क्र.एम.डी.एस./ शा.हमी/९२/२०२३-२४ दि. २६.०३.२०२३.
७. मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दि. २८.०३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि, मुंबई यांनी राज्यातील सहकारी साखर कारखाने व सुतगिरण्या यांना दिलेल्या हमी कर्जा संबंधातील बँक गॅरंटी इन्व्होक करण्यासाठी मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाविरुध्द सिव्हील अपिल नं.३४४५ /२०११ दाखल केलेले आहे. सदर न्यायालयीन प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस रु.१०४९.४१ कोटी अदा करण्यात आलेले आहेत. तथापि, महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने क्लेम कमिटीने निर्धारीत केलेल्या रक्कमेवरील दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.२.२०२२ पर्यंत येणा-या व्याजाची रक्कम व या रकमेवरील दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०३.२०२४ पर्यंतचे सरळ व्याजाने व्याज मिळणेसंदर्भात राज्य बँकेने मुळ सिव्हील अपिल क्रमांक ३४४५/२०११ मध्ये I.A.No.६०५८२/२०२२ दि. २२.०४.२०२२ रोजी दाखल केलेले आहे. परंतु सदर दाव्याच्या अनुषंगाने मागणी केलेली रक्कम मार्च २०२४ अखेर प्राप्त होणार

असल्यास बँक मा. सर्वोच्च न्यायालयात सादर केलेला दावा मागे घेण्यासंदर्भात लेखी हमी देण्यास तयार असल्याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये कळविले आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने दिलेल्या प्रस्तावावर मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दि. २८.०३.२०२४ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

१. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाविरुध्द सिव्हील अपिल नं.३४४५ /२०११ दाखल केलेली याचिका तसेच, त्यानुषंगाने दाखल केलेले इतर दावे संपूर्णत: मागे घेण्यात यावेत.

२. सिव्हील अपिल नं.३४४५ /२०११ मध्ये सर्वोच्च न्यायालयाने नियुक्त केलेल्या क्लेम कमिटीने निश्चित केलेली रक्कम रुपये १०४९.४१ कोटी Debt on Government या श्रेणीत मोडत असल्याने त्यावर रिझर्व्ह बँकेच्या व्याज दराप्रमाणे उशिराने अदा केलेल्या कालावधीसाठी व्याज अनुज्ञेय करता येईल. त्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने व्याज परिगणित करुन रक्कम शासनास त्वरित कळवावी. मात्र सदर उशिर कोव्हिडमुळे झाला असल्याने व्याजावर व्याज अनुज्ञेय नाही.

३. साखर आयुक्त यांनी त्यांच्या दि.२२.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये एकूण २०० कोटीची पुरवणी मागणी सादर केली होती त्यानुसार रु. २०० कोटी वितरित करण्यात येत आहे. परंतु महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने वरीलप्रमाणे रिझर्व्ह बँकेच्या व्याज दराप्रमाणे अचूक रक्कम परिगणित करुन कळविल्यानंतर साखर आयुक्तांनी तपासून प्रत्यक्ष येत असलेली रक्कम राज्य सहकारी बँकेस अदा करण्यात यावी व उर्वरित रक्कम शासनाकडे समर्पित करावी.

४. राज्य सहकारी बँक व साखर आयुक्त यांनी Joint Pursis (तडजोडीने) करुन सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सर्व याचिका मागे घेतल्यानंतर साखर आयुक्तांनी वरील रक्कम राज्य सहकारी बँकेला वितरित करावी.

५. सदर रक्कम मागणी क्र. व्ही-२, २४२५(०१)(०८) साखर आयुक्त कार्यालयाचे बळकटीकरण (अनिवार्य), १३-कार्यालयीन खर्च (२४२५ १०५४) या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात येऊन आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रक्कम रु, २०० कोटी आपल्या बँक खाती आहरित करुन ठेवावी व वरील बाबींची पुर्तता झाल्यानंतर महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस वितरित करण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी साखर आयुक्तालय यांना आहरण व संवितरण अधिकारी व साखर आयुक्त यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२२/२०२४/व्यय-२, दि. २८.०३.२०२४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३०१८३५१७१३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2024.03.30 18:47:34 +05'30'

**( अंकुश शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
४. प्रधान महालेखापरिक्षक, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
७. महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
८. महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
९. संचालक (अर्थ), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१३, (अर्थोपाय शाखा)
१३. कार्यासन १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती ( ३-स).